**राष्ट्रीय रुरबन अभियान (National Rurban Mission-NRuM) या योजनेंतर्गत नियंत्रक अधिकारी/आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः रुरबन-२०१८/प्र.क्र. १०३/योजना-१
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक: १९ नोव्हेंबर, २०१८

वाचा-१) शासन निर्णय,ग्रा.वि.वि. एनआरएम २०१६/प्र.क.०१/योजना-४ दि. १४ जानेवारी,२०१६
२) शासन निर्णय,ग्रा.वि.वि. एनआरएम २०१६/प्र.क.१२/योजना-४ दि.६ जुलै,२०१७

**प्रस्तावना :-**

ग्रामीण व शहरी भागातील विकासाचा असमतोल दूर करणे, यामध्ये प्रामुख्याने आर्थिक व तांत्रिक सोयी सुविधा ग्रामीण भागामध्ये उपलब्ध करुन देणे , यांअनुषंगाने राज्यामध्ये केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय रुरबन अभियान (*National Rurban Mission-NRuM*) सन २०१५-१६ या आर्थिक वर्षापासून संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये सुरु करण्यात आलेले आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी अर्थसंकल्पीय तरतूद करण्याकरीता लेखाशिर्ष उघडण्यास उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

या योजनेअंतर्गत केंद्र शासनाकडून गाव समुहांना उणिवा निवारण निधी ( *Critical Gap Funding-CGF*) अंतर्गत निधी प्राप्त होत आहे, सदर निधी व त्याचा समरुप राज्य हिस्सा व २ % प्रशासकीय निधीचा वापर करण्यासाठी अभियानातील अधिका-यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी घोषित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्य व्यवस्थापन कक्ष -रुरबन या कार्यालयाकरिता शासकीय निधी वितरीत करण्यासाठी नोडल ऑफिसर (रुरबन ) यांना नियंत्रक अधिकारी व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (रुरबन) या पदधारक यांना महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम १५६ च्या तरतूदीनुसार आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२४/१८/कोप्र-५ दि.०८/०८/१८ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३) सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११९१६४४०५१९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr. Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr. Vasant Gopal Mane
Date: 2018.11.20 15:39:21 +05'30'

(डॉ.वसंत माने)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
४. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव
७. मा. अपर मुख्य सचिव (वित्त/ नियोजन/)
८. महालेखापाल (लेखा परिक्षण) मुंबई/नागपूर
९. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
१०. वित्त विभाग (कोषा.प्रशा-५), मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन अधिकारी, वित्त-१, ग्राम विकास विभाग
१२. निवडनस्ती